महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेसमधून कर्तव्यार्थ प्रवास करणा-या कारागृह कर्मचा-यांच्या प्रवास खर्चापोटी सन १९९७-९८ या वर्षात अदा करावयाची रक्कम.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक-एमआयएस-०१९७/१६[८८]/पोआरएस-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:- ७ ऑगस्ट १९९७.

वाचा:- १] शासन निर्णय, क्रमांक-एमआयएस-०१९६/१२[५७]/पोआरएस-२, दिनांक २८ ऑगस्ट १९९६.

२] उपमहाव्यवस्थापक [वाहतूक] महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्रमांक-राप/वाह/पोमोवा /२०५/४२७२, दिनांक १ जुलै ९७.

शासन निर्णय:- महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या त्यांच्या बसेसमधून कर्तव्यार्थ प्रवास करणा-या, कारागृह कर्मचा-यांच्या प्रवास खर्चापोटी प्रथम ढोबळ रक्कम देण्यात येते व नंतर प्रत्यक्ष प्रवासासाठी एकूण देय रकमेनुसार देय ठरणारी रक्कमही दिली जाते. हीच प्रथा पोलीस विभागातही अस्तित्वात आहे. त्यानुसार १९९६-९७ या वर्षात कारागृह विभागाशी संबंधित प्रत्यक्ष प्रवास भाड्यापोटी खर्च झालेली रक्कम व तात्पुरती दिलेली प्रवास भाड्याची रक्कम यातील फरक तसेच १९९६-९७ मध्ये झालेल्या प्रत्यक्ष खर्चाच्या आधारे १९९७-९८ साठी द्यावयाची तात्पुरती ढोबळ रक्कम अदा करावी अशी विनंती वरील पत्रान्वये महामंडळाने शासनास केली आहे. त्यानुसार सन १९९६-९७ या वर्षात दिलेली तात्पुरती रक्कम व प्रत्यक्ष खर्च झालेली रक्कम यातील फरक रुपये १,२४,२८९/- [अक्षरी रुपये एक लाख चोवीस हजार दोनशे एकोणनव्वद मात्र] ही सन १९९७-९८ या वर्षासाठी द्यावयाच्या तात्पुरत्या रकमेतून रुपये २६,६०,५३६/- [रुपये सव्वीस लाख साठ हजार पाचशे छत्तीस मात्र] मधून वळती करुन फक्त रुपये २५,३६,२४७/-[रुपये पंचवीस लाख छत्तीस हजार, दोनशे सत्तेचाळीस फक्त] एवढी रक्कम महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्यास शासन या आदेशाद्वारे मंजूरी देत आहे. ही रक्कम तात्काळ महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्यात यावी.

२. यासाठी होणारा खर्च "२०५६ तुरुंग-००१-संचालनालय व प्रशासन ००१[एक] कारागृह निरीक्षणालय-२०, इतर खर्च दत्तमत्त" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो चालू वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

..२.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-सीआर-४३६/९७/व्यय-८, दिनांक २८ जुलै १९९७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ सी. बी. चौधरी ]
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

१] कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२] महालेखापाल, महाराष्ट्र १ व २ [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई/नागपूर.
३] महालेखापाल, महाराष्ट्र १ व २ [लेखा परिक्षा] मुंबई/नागपूर.
४] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५] निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६] उपमहाव्यवस्थापक [वाहतूक] महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
७] कोषागार अधिकारी, पुणे.
८] वित्त विभाग [व्यय-८]
९] गृह विभाग, जेयुडी-१/पोल-५ ब.